आदिवासी विकास विभागांतर्गत स्थापन करण्यात आलेल्या “बांधकाम व्यवस्थापन कक्षाची” कार्यकक्षा वाढविण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन,**
**आदिवासी विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : शाआशा-२०१५/प्र.क्र.९८/का.१३,**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक : १३ फेब्रुवारी, २०२५.

**वाचा :-** आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक शाआशा-२०१५/प्र.क्र.९८/का.१३, दिनांक १४ जुलै, २०१६.

**प्रस्तावना :-**

आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्रमांक शाआशा-२०१५/प्र.क्र.९८/का.१३, दिनांक १४ जुलै, २०१६ अन्वये आदिवासी विकास विभागांतर्गत येणाऱ्या शासकीय आश्रमशाळा व वस्तीगृहांच्या इमारतींचे बांधकाम व देखभाल दुरुस्तीची कामे अपेक्षित गतीने तसेच गुणवत्तापूर्वक पूर्ण होण्याच्या दृष्टीने स्वतंत्र बांधकाम व्यवस्थापन कक्ष स्थापन करण्यात आलेला आहे. स्वतंत्र बांधकाम व्यवस्थापन कक्ष स्थापन केल्यामुळे दुर्गम भागातील रेंगाळलेली कामे प्राधान्याने सुरु करण्यास मदत झालेली आहे, तसेच आदिवासी क्षेत्रात विखुरलेली कामे, समर्पित अभियंते पूर्णवेळ कामाला उपलब्ध झाल्याने विहीत कालमर्यादेत पूर्ण करणे शक्य झालेले आहे. समर्पित आदिवासी बांधकाम विभाग व उप विभाग नव्याने निर्माण केलेल्या स्वतंत्र बांधकाम व्यवस्थापन कक्षाच्या नियंत्रणाखाली काम करत असून तो त्यांना उत्तरदायी आहे व सदर स्वतंत्र बांधकाम व्यवस्थापन कक्षाचे राज्यस्तरावरील प्रमुख मुख्य अभियंता हे सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे प्रशासकीय नियंत्रणाखाली असल्याने निधीचे व कामाचे योग्यप्रकारे नियोजन करणे शक्य झालेले आहे.

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या अखत्यारित असलेली सर्व बांधकामे व देखभाल दुरुस्तीची कामे सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत करण्यात येत असल्याने व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिकाऱ्यांना इतरही शासकीय विभागातील इमारती व अन्य बांधकामांची कामे करणे क्रमप्राप्त असल्याने सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागातील निवासी शाळा, शासकीय वस्तीगृहे व इतर सर्व बांधकामे ही अपेक्षित गतीने पूर्ण होत नाहीत. तसेच कामाच्या दर्जावरही विपरित परिणाम होत आहे. परिणाम स्वरुप सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागांतर्गत येणाऱ्या लाभार्थ्यांना विहीत कालमर्यादेत सोयी-सुविधा उपलब्ध होत नाहीत. ही बाब विचारात घेता, आदिवासी विकास विभागाप्रमाणेच सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागांतर्गत येणाऱ्या बांधकामासाठी स्वतंत्ररित्या बांधकाम व्यवस्थापन कक्ष असावा असा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

यासंदर्भात दिनांक ३१.१२.२०२४ रोजी मा.मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या १०० दिवसांच्या नियोजन आराखड्याच्या बैठकीत मा. मुख्यमंत्री महोदयांनी खालीलप्रमाणे निर्देश दिले आहेत :-

"आदिवासी विकास विभागांतर्गत येणारी सर्व बांधकामे करण्याकरीता स्वतंत्र बांधकाम व्यवस्थापन कक्ष तयार करण्यात आला असून त्यासाठी विभागनिहाय सार्वजनिक बांधकाम विभागाचे अधिकारी आदिवासी विकास विभागाच्या अधिनस्त प्रतिनियुक्तीने कार्यरत आहेत. याच धर्तीवर सामाजिक न्याय विभागांतर्गत येणारी सर्व बांधकामे करण्याकरीता आदिवासी विभागाच्या यंत्रणेचा उपयोग करून घेण्यात यावा. यासाठी आवश्यक असणारा एक अतिरीक्त विभाग व त्यावरील सार्वजनिक बांधकाम विभागाचे अधिकारी प्रतिनियुक्तीवर घेण्याबाबतचा प्रस्ताव विहित मार्गाने तात्काळ सादर करावा."

उपरोक्त निर्देशानुसार आदिवासी विकास विभागांतर्गत स्थापन करण्यात आलेल्या स्वतंत्र बांधकाम व्यवस्थापन कक्षाची कार्यकक्षा वाढवून सदर कक्षाकडे सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागांतर्गत येणारी सर्व बांधकामे व देखभाल दुरुस्तीची कामेही सोपविण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## <u>शासन निर्णय</u> :-

आदिवासी विकास विभागांतर्गत कार्यरत स्वतंत्र बांधकाम व्यवस्थापन कक्षाची कार्यकक्षा वाढवून या कक्षामार्फत सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागांतर्गत येणारे सर्व बांधकामे, देखभाल व दुरुस्तीची कामे करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर स्वतंत्र बांधकाम व्यवस्थापन कक्षाची कार्यकक्षा वाढविण्यात आल्यामुळे सध्या अस्तित्वातील स्वतंत्र बांधकाम व्यवस्थापन कक्षामध्ये खालीलप्रमाणे अतिरिक्त कार्यालये कार्यान्वित करुन समर्पित स्वरुपात अभियंते व कार्यालये सार्वजनिक बांधकाम विभागाकडून उपलब्ध करुन देण्यात येतील :-

| अ.क्र. | कार्यालयाचे नांव व संख्या | ठिकाण | पदांची संख्या | समर्पित स्वरुपात उपलब्ध करुन द्यावयाचे अधिकारी व कार्यालये |
|---|---|---|---|---|
| १ | अधीक्षक अभियंता कार्यालय (१) | पुणे | १ | अधीक्षक अभियंता |
| २ | कार्यकारी अभियंता कार्यालये (२) | १.पुणे<br>२.छत्रपती संभाजी नगर | २ | कार्यकारी अभियंता |
| ३ | उप अभियंता कार्यालये (८) | सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागामार्फत ठरविण्यात येईल. | ८ | उप अभियंता |

३. उपरोक्त सर्व कार्यालयांसाठी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या अखत्यारितील अस्तित्वातील कार्यालये सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागामार्फत उपलब्ध करुन देण्यात येतील.

४. वर नमुद केलेल्या कार्यालयासाठी समर्पित स्वरुपात अधीक्षक अभियंता ते उप अभियंता तसेच त्यांच्या कार्यालयातील उर्वरित सर्व अधिकारी व कर्मचारीवृंद सार्वजनिक बांधकाम विभागाकडून त्यांच्या सर्व क्षेत्रिय प्रशासकीय यंत्रणेची पुर्नरचना करुन समर्पित स्वरुपात उपलब्ध करुन देण्यात येईल. तसेच, समर्पित अधीक्षक अभियंता, पुणे यांचे नियंत्रणाखाली वरीलप्रमाणे स्वतंत्र बांधकाम विभाग व उप विभाग स्थापन करण्यात येईल, त्यासाठी कोणत्याही प्रकारची नवीन पदे निर्माण करण्यात येणार नाही.

५. सदर बांधकाम व्यवस्थापन कक्षाचे राज्यस्तरावरील प्रमुख मुख्य अभियंता हे असतील व त्यांचेवर सचिव, आदिवासी विकास विभाग यांच्याप्रमाणेच प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांचे प्रशासकीय नियंत्रण राहील.

६. पुनर्रचना केलेल्या बांधकाम व्यवस्थापन कक्षातील अधीक्षक अभियंता यांचे कार्यक्षेत्रात कोणत्या जिल्ह्याचा समावेश करायचा याचा निर्णय आदिवासी विकास विभाग व सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग स्वतंत्ररित्या घेतील.

७. आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय दिनांक १४ जुलै, २०१६ मधील तरतूदीनुसार बांधकाम व्यवस्थापन कक्षातील कनिष्ठ अभियंता ते मुख्य अभियंता ही पदे सार्वजनिक बांधकाम विभागाकडून प्रतिनियुक्तीने भरण्यात येतील.

८. उपरोक्त समर्पित अधीक्षक अभियंता ते उप अभियंता यांच्या कार्यालयातील उर्वरित पदे ही सध्याच्या अस्तित्वातील कार्यपध्दतीनुसार भरण्यात येतील.

९. नाशिक येथील अधीक्षक अभियंता सा.बां. (आदिवासी व सामाजिक न्याय) मंडळ, नाशिक हे आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचेसाठी तसेच पुणे येथील अधीक्षक अभियंता सा.बां. (आदिवासी व सामाजिक न्याय) मंडळ, पुणे हे आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांचेसाठी राज्य समन्वयाचे काम करतील.

१०. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागांतर्गत सद्य:स्थितीतील सर्व कामे सार्वजनिक बांधकाम विभागाच्या यंत्रणेने त्वरित बांधकाम व्यवस्थापन कक्षाकडे हस्तांतरित करावी.

११. वाचा येथील आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय दिनांक १४ जुलै, २०१६ च्या उर्वरित तरतूदी यापुढेही कायम राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०२१३१८२८१८७०२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VIJESING FATTESING VASAVE

Digitally signed by VIJESING FATTESING VASAVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=5494d2ad3a3bc5ddd66daf9a8f17ceec5e2d7d4b6a8bba99c51d275801bcdf1b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2182F4F20DAA6841AB430B2FD812E7B5D3A883E72EFA574CA5E29FF528BC8015, cn=VIJESING FATTESING VASAVE
Date: 2025.02.13 18:29:43 +05'30'

**( वि. फ. वसावे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत :-**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री, सार्वजनिक बांधकाम, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री, आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई.
५. मा.मंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय,मुंबई.
६.सर्व मा. मंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
७. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई.
८. मा. राज्यमंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
९.सर्व मा. राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
१०. सर्व मा. विधानसभा सदस्य.
११. सर्व मा. विधानपरिषद सदस्य.
१२.मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
१३. मा. अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. अ.मु.स./प्र.स/सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय, मुंबई.
१५.प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय,मुंबई.
१६. मा. सचिव, आदिवासी विकास, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१७. मा. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
१८. आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे.
१९.आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
२०. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
२१. सर्व जिल्हाधिकारी.
२२. अपर आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य नागपूर/नाशिक/ठाणे /अमरावती.

२३. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
२४. महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था (बार्टी) पुणे.
२५.महालेखापाल (लेखा परिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
२६. महालेखापाल (लेखा परिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
२७.सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग.
२८.सर्व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण विभाग.
२९.सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी, समाजकल्याण विभाग.
३०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
३१. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३२. संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
३३. सर्व उप सचिव/ अवर सचिव/कार्यासन अधिकारी, आ.वि.वि., मंत्रालय, मुंबई.
३४. सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय,मुंबई.
३५. सहसचिव/ उप सचिव (व्यय-१४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३६. निवडनस्ती (का-१३) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.